विमानचालन संचालनालय, मुंबई च्या आस्थापनेवरील सह वैमानिक (विमान) या पदावर कॅ. मनिष काशीब यांना तीन महिने मुदतवाढ देण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः विचासं १६१५/प्र.क्र.१३१/२८-अ

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ६ जुन, २०१५.

वाचा -

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन २००९/प्र.क्र.५२६/०८/२८-अ, दि.१२.३.२०१०.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एव्हीएन १००९/प्र.क्र.६८१/२००९/२८-अ, दि.३१.३.२०१०.

३) कॅ.मनिष काशीब यांचा दिनांक ५.२.२०१५ राजीचा अर्ज.

प्रस्तावना -

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय, दिनांक १२.३.२०१० नुसार विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारित आकृतिबंधास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, दिनांक ३१.३.२०१० नुसार विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवरील मुख्य वैमानिक (हेलिकॉप्टर) / मुख्य वैमानिक (विमान) व वैमानिक या पदांसाठी वेतनमान निश्चित करण्यात आले आहे. कॅ. मनिष काशीब यांची दिनांक ५.६.२०१० रोजी विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर पाच वर्षाच्या कंत्राटी पध्दतीने सह वैमानिक (विमान) या पदावर नेमणूक झाली असून त्यांच्या कंत्राटाचा कालावधी दिनांक ४.६.२०१५ रोजी संपुष्टात आला आहे. तत्पुर्वी संदर्भ क्र.३ च्या अर्जान्वये कॅ. मनिष काशीब यांनी कायमस्वरूपी शासन सेवेत सामावून घेण्याबाबत अर्ज केला आहे. त्याअनुषंगाने कार्यवाही स्वतंत्र नस्तीवर सुरू आहे. दरम्यान कॅ. मनिष काशीब यांच्या कंत्राटाचा कालावधी संपुष्टात आल्याने त्यांना विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर सह वैमानिक (विमान) या पदावर तीन महीन्यांची मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

विमानचालन संचालनालयाच्या आस्थापनेवर सह वैमानिक (विमान) या पदावर कंत्राटी पध्दतीने कार्यरत, कॅ. मनिष काशीब यांना सदर पदावर तीन महीन्यांची मुदतवाढ देण्यात येत आहे.दरम्यानच्या कालावधीत त्यांना ५.६.२०१० च्या मुळ कंत्राटातील अटी-शर्ती लागू राहतील. सदर मुदतवाढीचा कालावधी सुरू असताना कॅ. मनिष काशीब यांना कायमस्वरूपी शासन सेवेत सामावून घेण्याबाबतचा निर्णय झाल्यास त्यांची कंत्राटी पध्दतीव्दारे करण्यात आलेली नियुक्ती संपुष्टात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०६१७१४०१९१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: CN = SAMEER ANANT SAWANT, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = General Administration Dept
Date: 2015.06.06 17:25:34 +05'30'

**( समीर सावंत)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक / उप संचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई.
३) कॅ. मनिष काशीब, विमानचालन संचालनालय, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) निवड नस्ती कार्यासन २८-अ, सा.प्र.विभाग, मंत्रालय, मुंबई.